**+२ स्तरावरील व्दिलक्षी व उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम सुधारीत प्रवेश नियमावली बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२००९/(२५३/०९)/व्यशि-४,

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १४ जुलै, २०११.

संदर्भ - १) महाराष्ट्र शासन, शिक्षण व सेवायोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : जीटीएस-१०८४/४९२६/(१०१/८४)/तांशि-२ड, दिनांक : २२ एप्रिल, १९८७.

२) प्र.संचालक, व्यवसाय शिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे क्रमांक :८/व्हीओसी/प्रवेश नियम/२००९/११०२, दिनांक ६.१०.२००९

**प्रस्तावना :-** राज्यात सन १९७८-७९ पासून व्यवसाय विषयाची ३० टक्के व्याप्ती असलेले व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम तसेच १९८८-८९ पासून व्यवसाय विषयाची ७० टक्के व्याप्ती असलेले उच्च माध्यमिक (पूर्वीचे एम.सी.व्ही.सी.) व्यवसाय अभ्यासक्रम सूरु करण्यात आलेले आहेत. सद्या संदर्भाकींत क्रमांक १ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार तसेच या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाच्या अधिन राहून व्यवसाय अभ्यासक्रमाकडील विद्यार्थ्यांना इयत्ता ११ वी मध्ये प्रवेश दिले जातात. प्र.संचालक, व्यवसाय शिक्षण यांनी संदर्भांकीत क्रमांक २ च्या पत्रान्वये +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रमासाठी स्वतंत्र प्रवेश नियमावलीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केलेला आहे.

+२ स्तरावरील व्दिलक्षी व उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम हे शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील शाळा/महाविद्यालये/संस्थामधून राबविण्यात येतात. इयत्ता ११ वी च्या वर्गाचे प्रवेश देण्यासंबंधीची कार्यपध्दती शालेय शिक्षण विभागामार्फत राबविण्यात येते. तसेच हया अभ्यासक्रमाच्या परिक्षा ही शालेय ष्क्षिण विभागा मार्फत घेतल्या जातात. त्यामुळे व्यवसाय अभ्यासक्रमाची स्वतंत्र प्रवेश नियमावली असावी की व्यवसाय अभ्यासक्रमासाठीच्या प्रवेशासाठी शालेय शिक्षण विभागाचे प्रवेश नियम वापरण्यात यावे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -** उपरोक्त बाबीचा सर्वकष विचार करुन +२ स्तरावरील व्दीलक्षी व उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या इयत्ता ११ वीचे प्रवेश शालेय शिक्षण विभागाकडे असलेल्या प्रवेश नियमावली नुसार व शालेय शिक्षण विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे व पूढील तरतूदीचा समावेश करण्यात येत आहे .

I) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी विहीत केलेल्या तांत्रिक / पूर्व व्यवसायिक विषयासह माध्यमिक शालांत परिक्षा उत्तीर्ण उमेदवारांसाठी अभ्यासक्रम निहाय ४०% जागा आरक्षित राहतील व या जागा गुणवत्तेनुसार भरण्यात येतील.

II) आदिवासी उपयोजनांतर्गत सुरु करण्यात आलेल्या किंवा सुरु करण्यात येणा-या संस्थेत अनुसूचित जमातीसाठीच्या विद्यार्थ्यांसाठी ७५% जागा राखीव असतील.

तसेच उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना प्रवेशसंदर्भात काही तक्रार / आक्षेप असल्यास सदर तक्रारीचे निवारण प्राचार्य / मुख्याध्यापक यांच्याकडून न झाल्यास अशा तक्रारीचे निवारण करण्यासाठी संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

या शासन निर्णयान्वये सदर्भांकित क्रमांक १ चा शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणकीय सांकेतांक क्रमांक २०११०७१४१७५५००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( शोभा वि. पत्की )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :

१) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१

२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक /कोल्हापूर/नागपूर / अमरावती/लातूर/औरंगाबाद. (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)

३) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई/नाशिक/ पुणे/अमरावती/ औरंगाबाद/नागपुर (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)

४) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)

५) संबंधित सर्व अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत, संचालनालयास विनंती करण्यात येते की सर्व संबंधित संस्थांना अवगत करावे.)

६) मा. मंत्री (उ.व तं.शि.), यांचे खाजगी सचिव

७) मा. राज्यमंत्री (उ.व तं.शि.), यांचे खाजगी सचिव

८) निवड नस्ती (व्यशि-४)